**महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान**
**नागपूर महानगरपालिका क्षेत्रातील जमीन संपादन प्रकल्पास (भंडारा रोड) मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- नगरो-२०१८/प्र.क्र.४५५/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
**दिनांक :- १७ नोव्हेंबर, २०१८**

**वाचा:-**

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र: नगरो २०१४/प्र. क्र.११९/नवि-३३, दिनांक २१ ऑगस्ट, २०१४.
२. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.६१७/नवि-३३, दिनांक ०४ मे, २०१८.
३. आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांचे पत्र क्र. मनपाना/नरवि/१५८५, दिनांक ०३.११.२०१८
४. आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांचे पत्र क्र. मनपाना/नरवि/१६०८, दिनांक १२.११.२०१८

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय महामार्गावरील नागरी क्षेत्रातील उड्डाणपूल, आरओबी, आरयुबी यांच्या कामाच्या अनुषंगाने भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणाची (NHAI) वैधानिक जबाबदारी नसलेल्या जागा संपादित करून देण्याची त्या-त्या स्थानिक स्वराज्य संस्था/महानगरपालिका यांची प्राथमिक जबाबदारी आहे. त्यामुळे, त्या-त्या स्थानिक स्वराज्य संस्था/महानगरपालिका यांनी टीडीआर (TDR) देऊन सदर जागा भूसंपादित कराव्यात. त्यासाठी आवश्यक तेथे विकास आराखडयात (Development Plan) बदल करण्याची देखिल कार्यवाही करावी. या प्रमाणे कार्यवाही करूनही जागा संपादित करणे शक्य नसल्याचे संबंधित जिल्हाधिकारी यांनी प्रमाणित केल्यानंतर संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या क्षेत्रामध्ये केंद्रीय भुपृष्ठ वाहतूक मंत्रालयाअंतर्गत भारतीय राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणामार्फत (NHAI) सध्या राबविण्यात येत असलेल्या उड्डाणपूल, आरओबी (ROB), आरयुबी (RUB) यांच्या प्रकल्पांच्या अनुषंगाने महानगरपालिकेने संपादन करणे आवश्यक असलेल्या जागांच्या भुसंपादनासाठी आवश्यक असलेला निधी महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानातून उपलब्ध करून देण्याचा निर्णय संदर्भाकिंत दिनांक ०४ मे, २०१८ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. तसेच, त्यामध्ये सुधारणा करण्याची कार्यवाही देखिल स्वतंत्रपणे करण्यात येत आहे.

०२. आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांनी त्यांच्या दि.०३.११.२०१८ व १२.११.२०१८ च्या पत्रान्वये नागपूर महानगरपालिकेच्या शहर हद्दीतून जाणाऱ्या राष्ट्रीय महामार्गावरील **जुना भंडारा रोड** मेयो हॉस्पिटल ते शहीद चौक पर्यंतच्या रस्त्याच्या रूंदीकरणाच्या केंद्रिय भूपृष्ठ वाहतूक

मंत्रालयामार्फत देण्यात येणाऱ्या निधीतून करण्यात येणाऱ्या कामाच्या अनुषंगाने केंद्रशासनाची वैधानिक जबाबदारी नसलेल्या व नागपूर महानगरपालिकेची जबाबदारी असलेल्या जागेच्या संपादनासाठी महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानाच्या माध्यमातून दिनांक ०४.०५.२०१८ च्या शासन निर्णयानुसार निधी उपलब्ध करून देणेबाबत शासनाकडे विनंती केली आहे. दिनांक ०४ मे, २०१८ च्या शासन निर्णयातील प्रस्तावित सुधारणेच्या अधीनतेने सदर प्रकल्पास तत्वत: मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाअंतर्गत सादर करण्यात आलेल्या नागपूर महानगरपालिका क्षेत्रातील राष्ट्रीय महामार्गावरील जुना भंडारा रोड मेयो हॉस्पिटल ते शहीद चौक पर्यंतच्या रस्त्याच्या रूंदीकरणाच्या केंद्रिय भूपृष्ठ वाहतूक मंत्रालयामार्फत देण्यात येणाऱ्या निधीतून करण्यात येणाऱ्या कामाच्या अनुषंगाने केंद्रशासनाची वैधानिक जबाबदारी नसलेल्या व नागपूर महानगरपालिकेची जबाबदारी असलेल्या जागेचे संपादन करण्यासाठी लागणाऱ्या रूपये १८५.०३ कोटींच्या प्रकल्पास उपरोक्त दिनांक ४ मे, २०१८ च्या शासन निर्णयातील तरतूदी व त्यामध्ये प्रस्तावित सुधारणांच्या अधीनतेने तत्वत: मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रकल्पाचा वित्तिय आकृतीबंध राज्य शासन ७० टक्के व नागपूर महानगरपालिका ३० टक्के असा राहील.

| **मनपाचे नाव** | **योजनेचे स्वरुप** | राज्य शासन हिस्सा (७० %) (रु. कोटी) | मनपा हिस्सा (३० % ) (रु. कोटी) | एकूण (रु. कोटी) |
|---|---|---|---|---|
| नागपूर | जुना भंडारा रोड मेयो हॉस्पिटल ते शहीद चौक पर्यंतच्या रस्त्याच्या रूंदीकरणाच्या अनुषंगाने जमीन संपादनाचा प्रकल्प | १२९.५२ | ५५.५१ | १८५.०३ |

३. संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयानुसार नागपूर महानगरपालिकेच्या सदर प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून तत्वत: मंजूरी देण्यात येत आहे:-

३.१ सदर उड्डाणपूल हा नागपूर महानगरपालिकेच्या क्षेत्रात असल्याचे आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांनी प्रमाणित केलेले आहे.

३.२ नागरी क्षेत्रातील उड्डाणपूल, आरओबी यांच्या कामाच्या अनुषंगाने राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणाची/ केंद्रशासनाची वैधानिक जबाबदारी नसलेल्या जागा संपादित करून देण्याची त्या-त्या स्थानिक स्वराज्य संस्था/ महानगरपालिका यांची प्राथमिक जबाबदारी आहे. त्यानुसार, प्रस्तावित

जागा संपादित करण्याची जबाबदारी नागपूर महानगरपालिकेची असल्याचे आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांनी प्रमाणित करावे.

३.३ संदर्भाकित शासन निर्णयातील तरतूदीनुसार अशा कामासाठी महानगरपालिकेने टीडीआर (TDR) देऊन सदर जागा भूसंपादित करणे व त्यासाठी आवश्यक तेथे विकास आराखडयात (Development Plan) बदल करण्याची देखिल कार्यवाही करणे आवश्यक आहे. या प्रमाणे कार्यवाही करूनही जागा संपादित करणे शक्य नसल्याचे संबंधित **जिल्हाधिकारी, नागपूर यांनी प्रमाणित करणे** आवश्यक राहील. यानुसार कार्यवाही करण्याच्या अधीन ही मान्यता देण्यात येत आहे.

३.४ सदर उड्डाणपूल, रस्ता रूंदीकरणाच्या केंद्रशासनपुरस्कृत प्रकल्पाची तांत्रिक व प्रशासकीय मान्यता होऊन केंद्र शासनाने प्रकल्पाचे काम सुरु केलेले असावे व तो प्रकल्प पूर्ण करण्यासाठी केंद्र शासनाने अर्थसंकल्पीय तरतूद केलेली असावी, या बाबीची आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांनी खातरजमा करावी व तसे प्रमाणित करावे.

३.५ अशा प्रकल्पामध्ये केंद्र शासनाने केलेल्या वा केंद्र शासनामार्फत करण्यात येत असलेल्या मुळ गुंतवणकीच्या प्रमाणात (प्रकल्प किंमतीच्या) महानगरपालिकेमार्फत करावयाच्या भूसंपादनासाठी करावयाच्या अनुषंगिक गुंतवणूकीचे प्रमाण एकूण प्रकल्प किंमतीच्या २५ टक्केपेक्षा जास्त असू नये, या अटीची पूर्तता होत असल्याची आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांनी खातरजमा करावी व तसे प्रमाणित करावी.

३.६ असे भूसंपादन राज्य शासनाच्या भूसंपादनाच्या धोरणानुसार करण्यात यावे. या प्रस्तावानुसार भूसंपादनासाठी द्यावयाच्या मोबदल्याची परिगणना करताना ती राज्य शासनाच्या भूसंपादनाच्या धोरणामध्ये विहित केलेल्या दरानुसार करण्यात आल्याची खातरजमा, जिल्हाधिकारी, नागपूर यांनी करावी व तसे प्रमाणित करावे.

३.७ संदर्भाकित अ.क्र.२ येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार, सदर प्रयोजनार्थ निधी उपलब्ध करून देण्यापूर्वी प्रकल्पांच्या भूसंपादनासाठी राज्याच्या भूसंपादन धोरणानुसार आवश्यक असलेल्या निधीबाबत पात्रापात्रतेबाबत आवश्यक छाननी ही संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी करतील, तसेच सदर प्रयोजनार्थ आवश्यक असलेल्या निधीबाबतची नागरी स्थानिक स्वराज संस्थेची मागणी ही संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी प्रमाणित करतील, अशी अट आहे. यानुसार सदर प्रस्तावात अंतर्भूत रकमेची परिगणना व जिल्हाधिकारी, नागपूर यांनी प्रमाणित करावी व तसे प्रमाणपत्र सादर करावे. या प्रमाणीकरणानुसार या प्रकल्पाची किंमत परिच्छेद २ मध्ये नमूद किंमतीच्या मर्यादेत सुधारीत करण्यात येईल.

३.८. सदर प्रयोजनार्थ जागा संपादित करण्याचा महानगरपालिकेचा ठराव होणे आवश्यक आहे. तसा ठराव करून तो सादर करण्याची जबाबदारी आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांची राहील.

३.९ सदर प्रयोजनार्थ वितरीत करण्यात येणारा निधी हा प्रामुख्याने तीन टप्प्यामध्ये वितरीत करण्यात येईल. प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर व परिच्छेद ३.१ ते ३.८ ची पूर्तता करून महानगरपालिकेकडून निधी मागणी प्रस्ताव प्राप्त झाल्यांनतर राज्य शासनाकडून प्रथम टप्प्याचा निधी वितरीत करण्यात येईल. सदर निधी संबंधित भूधारकास उपलब्ध करून देण्यात यावा.

३.९ सदर प्रथम हप्त्याचा निधी व वित्तीय आकृतीबंधानुसार त्या प्रमाणात नागपूर महानगरपालिकेचा हिस्सा अशा एकत्रित निधीतून नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने संबंधित भूधारकास उपलब्ध करून देऊन त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्यानंतर तसेच सदर जागा नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या ताब्यात आल्याबाबतचा तपशील शासनास उपलब्ध करून दिल्यानंतर त्यापुढील हप्त्याचा निधी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस उपलब्ध करून देण्यात येईल.

३.१० वरीलप्रमाणे निधीचे नियोजन करून आवश्यक असलेली जागा विहित कालावधीमध्ये ताब्यात घेऊन प्रकल्पाचे काम सदर बाबीमुळे रेंगाळणार नाही, याची सर्वस्वी जबाबदारी ही **जिल्हाधिकारी, नागपूर व आयुक्त, नागपूर महानगरपालिका** यांची राहील.

३.११ महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानामधून भूसंपादनासाठी निधी देण्याबाबतची ही तरतूद फक्त एक वेळ निधी देण्यापुरती (One Time Settlement) मर्यादित असेल व त्यानंतर न्यायालयाच्या किंवा इतर कोणत्याही आदेशामुळे किंवा कोणत्याही कारणामुळे अशा जमिनीच्या मोबदल्यात वाढ करण्याचे आदेश झाल्यास त्याची भरपाई या योजनेतून करण्यात येणार नाही. ती जबाबदारी **नागपूर महानगरपालिकेची** राहील. असा खर्च नागपूर महानगरपालिकेने स्वनिधीतून करावा व तसे त्यांनी प्रमाणित करावे.

३.१२ याशिवाय संदर्भातील संदर्भाकित शासन निर्णय दिनांक ०४ मे, २०१८ मध्ये विहित इतर अटी व शर्ती व त्या अनुषंगाने होणारी सुधारणा या प्रकल्पाच्या अनुषंगाने नागपूर महानगरपालिकेवर बंधनकारक राहतील

४. **सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातील सुधारणांची पूर्तता :-** महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाच्या संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयानुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना खाली दर्शविलेल्या बंधनकारक सुधारणा (रिफॉर्म) पूर्ण करणे आवश्यक राहील.

४.१ प्रकल्प मंजुरीच्या पहिल्या वर्षात नगरपरिषदेने त्यांच्या कामकाजाचे पूर्ण संगणकीकरण करणे अनिवार्य राहील. यात प्रामुख्याने ई-गव्हर्नन्स, लेखा, जन्म-मृत्यु नोंद सुधारणा याची १०० टक्के अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील.

४.२ उचित उपभोक्ता कर लागू करुन किमान ८० टक्के वसुली करणे.

४.३ नागरी क्षेत्रातील गरिबांसाठी अर्थसंकल्पात विवक्षित निधीची तरतूद करणे.

४.४ संबंधित स्थानिक नागरी स्वराज्य संस्थेने, द्विलेखा नोंद पद्धती सहा महिन्यात पूर्ण करणे आवश्यक राहिल.

४.५ संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या क्षेत्रातील मालमत्ता कराचे पुर्नमुल्यांकन झाले नसल्यास, प्रकल्प मंजूरीपासून पुढील एक वर्षाच्या कालावधीत ते पूर्ण करणे बंधनकारक राहिल.

४.६ संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने “घनकचरा व्यवस्थापन नियम २०१६” च्या तरतूदीनुसार त्यांच्या कार्यक्षेत्रातील घनकचरा व्यवस्थापन उचित रित्या करणे बंधनकारक राहील.संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या कार्यक्षेत्रातील मालमत्ता कराची व पाणीपट्टीची वसुली पहिल्या वर्षी किमान ८०% करणे बंधनकारक राहील. त्यापुढील वर्षात सदरहू वसूली उर्वरीत ९०% या प्रमाणात करणे आवश्यक राहील.

४.७ नागपूर शहरातील कचऱ्याचे १००% Door to Door संकलन करुन वर्गीकरण डिसेंबर, २०१८ पर्यंत पूर्ण करण्यात यावे.

५. <u>**निधी वितरणाची कार्यपद्धती :-**</u>

५.१ महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील प्रकल्पांसाठी प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर संबंधित नागरी स्वराज्य संस्थेने प्रकल्पाचा आर्थिक आराखडा (Financial Closure Report) नगर विकास विभागास सादर करावा. त्यानंतर सदर प्रकल्पासाठी पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत करण्यात येईल. त्याकरिता परिच्छेद ३ मध्ये नमूद आवश्यक प्रमाणपत्रे सादर करावीत.

५.२ महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान अंतर्गत मंजूर प्रकल्पास पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत केल्यानंतर तो तसेच, नागपूर महानगरपालिकेचा समप्रमाणातील हिस्सा शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहित केलेल्या बँकांमध्ये, स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील. नागपूर महानगरपालिकेचा स्वहिस्सा महानगरपालिकेने १४ व्या वित्त आयोगाच्या, वस्तू व सेवा कराच्या अनुदानातून किंवा स्वनिधीतून उभारावा.

५.३ राज्य शासनाने वितरीत केलेल्या पहिल्या हप्त्याच्या अनुदानाच्या व महानगरपालिकेचा समप्रमाणातील स्वहिश्श्याचा निधी यांच्या एकूण रकमेच्या ७० टक्के खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र, नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर केल्यानंतर राज्य शासनाचा दुसरा हप्ता वितरीत केला जाईल.

५.४ नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी दुसऱ्या हप्त्याची मागणी करण्याचा प्रस्ताव नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर करावा. नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी प्रस्तावांची छाननी करून उचित अभिप्रायांसह शासनास प्रस्ताव सादर करावा.

६. **निधी न वळविणे :-** महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील मंजूर प्रकल्पांसाठी राज्य शासनाने मंजूर केलेला निधी फक्त त्याच प्रकल्पासाठी वापरता येईल व तो अन्य कोणत्याही कामासाठी वळवता किंवा वापरता येणार नाही. अशाप्रकारे मूळ निधी किंवा त्यावरील व्याज कायम स्वरुपी किंवा तात्पुरत्या स्वरुपात अन्यत्र वळविणे ही गंभीर स्वरुपाची आर्थिक अनियमितता मानली जाईल, त्यासाठी संबधित स्थानिक स्वराज्य संस्था/संबधित अधिकारी कारवाईस पात्र ठरतील.

७. **प्रकल्पांचे त्रयस्थ लेखापरिक्षण:-** महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांचे, अंमलबजावणीच्या विविध टप्प्यावर संचालक स्थानिक निधी लेखा यांच्याकडून त्रयस्थ लेखापरिक्षण (थर्ड पार्टी ऑडीट) करून घेणे नागपूर महानगरपालिकेवर बंधनकारक राहिल.

८. **इतर बंधनकारक अटी व शर्ती :-** राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नागपूर महानगरपालिकेची राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१११७१७३२५६०८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2018.11.19 11:05:31 +05'30'

**(पां. जो. जाधव)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
७. विभागीय आयुक्त, नगापूर.
८. आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
९. जिल्हाधिकारी, नागपूर
१०. जिल्हा प्रशासन अधिकारी, नागपूर.
११. निवडनस्ती, नवि-३३.